ई-साहित्य प्रतिष्ठान
वर्ष तिसरे, अंक – १६ वा,
१८ एप्रिल २०११

**संपादिका**

सोनाली घाटपांडे (पुणे)

**सह संपादक**

भारती सरमळकर (मुंबई)

स्वप्ना कोल्हे (नाशिक)

सचिन काकडे (मुंबई)

शशिकांत रणवरे (ठाणे)

सारंग भणगे ( पुणे )

## निळी फुल

अबोल ती

नाजूक ही

रंग साजेसा

पाकळी निळी

पान हिरव

वाकडा देठ

फुलण्या आतुर

प्रत्येक कळी

सरली पहाट

दुपार टळली

माझ्या शब्दांतली

फूल खुलली.....

**चैताली म्हापसेकर**



## माझा मोगरा

काय सांगु यार हो
असा सजुन येतो मोगरा
बहरतो माझ्या मनी
अन् त्रास देतो मोगरा

तेंव्हाची साथ आहे
जेंव्हा हाती माळला मोगरा
मादक मंद सुरेखीत
कमनीय आहे मोगरा

याच मोग-याने केले होते
सुगंधी वार माझ्यावरी
आज त्याच जखमांवरी
न्यौछावर झालाय मोगरा

आहे माझ्यासवे आज
मैफ़लीला मोगरा
बरसुन गेल्यावरी ही
असुसलेला मोगरा

ओलेत्या मनी,
मोगरयाचा सुगंध गंधाळला,
अन् स्मृतीत आठवांच्या,
मी हरवलेला, एकला.....

**मकरंद बापट**



# चाफा..!

काय म्हणता माझे नाव
चाफा म्हणूनी वदती सर्व
जात कुळी मध्ये मी एकला
पांढरा चाफा म्हणती मजला

रूप माझे असे की सुंदर
शुभ्र तनू अन नाभी शेंदूर
तारूण्याची लेऊन झालर
एकटेच जग़णे कसला हा वर

जीवन माझे सरता सरता
बहरून येतील वसंत-वर्षा
नवी विरूधा जन्म घेईल
उजळून निघतील दाही दिशा

साथसंगत सोडली त्यांनी
पानगळ आली म्हणोनी
खराट्यावरचे फूल होऊनी
काय पावलो जन्मा येऊनी

वाटते मग असेच करावे
जीवन आपुले सार्थ करावे
उतरूनी अलगद फांदीवरूनी
शिवचरणी त्या अर्पित व्हावे...

**प्राजक्ता पटवर्धन**



## तुझ्या मनाचा प्राजक्त

तुझ्या मनाचा प्राजक्त
दरवळ् श्वासास माझ्या
आठ्व उदयता  हृदयी
पापणीत भिजती तिन्हीसांजा.

पुराणिच साथ रे अपुली
तरि नित्य तिची नवलाई
येई सामोरि जेव्हा
मन वसंत बहरुन जाई.

कळती मजलाहि उसासे
तव श्वासास भारलेले
लयबद्ध सुरावटिवरति
जणू ठेक्यास मारलेले

परि नाजुक रे, ते अनुबंध
श्वासास भार का होती,
ह्रदयाची मापून खोली
अंतरीचा कब्जा घेती.

**सुमन परब**



## अग्निशिखा

चैत्र अग्निशिखा पेटवून जातो
अबोलीस गुलमोहर उजवून जातो

लज्जा हिरवी गळते अलवार
लालबुंद तो कटाक्ष चेतवून जातो

रक्तवर्णी पाकळ्या टोचती तनुस
स्पर्श उष्णसा फुलवून जातो

दिन बेभानसे पेटता फुलांनी
रात ठिणग्यांनी सजवून जातो

मंदावता वणवे ज्येष्ठाच्या खुणेने
निखारे तो मेघांनी विझवून जातो

भले नाकार सत्य तू स्वप्ना
गुलमोहर तुज सुलगवून जातो

**स्वप्ना कोल्हे**



## मालतीचा सडा

आज बागेमध्ये मालतीचा सडा
गंधतो अंगणा पावलांचा सडा

चांद होता जरा काल राती खुळा
केव्हढा सांडला चांदण्याचा सडा

वाहतो गार वारा शहारा उठे
लाज शृंगारण्याच्या क्षणांचा सडा

रूप ते पाहुनी आरसा दंगता
भंगला, वेचतो आज त्याचा सडा

ही नशा राहु दे झिंगलो मी असा
पापणी पेलताना दवाचा सडा

शायरी खुद्द ती, शब्द होते तिचे
गुंफतो  "जीत" त्या आठवांचा सडा

**रणजित पराडकर**



## कमळ

संथ निळ्या पाण्यामधे
खोलवर ग चिखल
चिकाटीने डोक काढी
शुभ्र-शुभ्र ते **कमळ**.

हिरवी पानं सांगी मिथ्या
चिंता झट्क झटक
होवू दुःखा वरचढ
ठरु भ्रमरा सार्थक.

अनिती माजे सर्वदूर
चित्त ठेव ग निर्मळ
जरी उगवलं घाणीतून
देवीवर चढवलं.

अरे मानुस मानुस
कमलापरी जरा आसं
देई सुख सकलासी
दुखः भोगुनिया खास.

**सुप्रिया जाधव**



# जाई जुई

पानच्या मागून ,
लपून छपून ,
गोड गोड हसून ,
बघते कशी .
कळी ती अशी , जाई जुई .....

पहाटे बोलली ,
मोहोळ खोलली ,
कुपी ओतली ,
सुगंध खुशी.
कळी ती अशी , जाई जुई ......

फ़ुले बीचारी ,
काल वीचारी ,
माझ्या दारी ,
आलीस कशी ?
कळी ती अशी , जाई जुई ......

लाजली पालव ,
माघारी घालव ,
पापण्या मालव ,
म्हणाली नीशी ,
कळी ती अशी , जाई जुई .......

**रोहिणी जोगळेकर**



# रातराणी...

तिने विचारलं, तुला कुठलं फुल आवडेल...?
...
तो क्षणात उत्तरला,
मनात जपायला चाफा आवडेल
आणि ओंजळीत धरायला मोगरा...
...
वहीत ठेवायला बकुळ आवडेल
आणि धूंद व्हायला केवडा...
...
बोलायला अबोली आवडेल
आणि फुलायला सदाफुली...
...
पण, प्राजक्त मात्र आवडेल तो,
देवाच्या पायाशी ठेवायला...
आशीर्वादासाठी...
...
यावर ती थोडीशी नाराज झाली..
कारण तिचं नाव रातराणी होतं...
...
त्यानं ते ओळखलं...तो पुढे झाला ...
आणि हलकेच हसत म्हणाला,
हे सगळं नंतर आवडेल  रातराणी खिडकीशी ...
!...दरवळल्यानंतर
...
तेव्हापासून ती अखंड दरवळते आहे...
त्याच्या मनात!!!...अंगणात ...

**महेश घाटपांडे**



# अबोली जरी ती

वसंता तुला रे, दया आज आली
कळीही फुलांया, बगीचात आली

पहा हो पहा लाजली ही अशी की
गुलाबी छटा घेउनी सांज आली

अबोली जरी ती,भुलविते मनासी
मला मोहण्या ती, पहा खास आली

नको हाक देणे, न येणार आता
मला वाटले ती, रहाण्यास आली

म्हणेना अभागी तुला काय त्याचे
तिचे भाग्य तेथेच ठेवून आली

नको गाळु अश्रू मना घे उभारी
तुझी भेट घेण्या पहा तीच आली

नको घालवू रात्र ऊदासवाणी
तुला भेटण्या ती पहाटेच आली

**रजनी अरणकल्ले**



# गुलाब....

रंग गुलाबी लाल गुलाब
मोहक सौंदर्याची खाण गुलाब
लाजत मुरडत मिटून ठेवते
नववधू ओठांचा गोड गुलाब

प्रेमाचे प्रतिक आहे गुलाब
हृदयाचे मिलन करतो गुलाब
आकर्षित करून नयन बाहुल्या
प्रेमाची उधळण करतो गुलाब

प्रेमाच्या सदभावना फुलवितो गुलाब
काट्यांच्या सहवासात खेळतो गुलाब
हृदयी बहार वसंत फुलऊन
प्रेमाची मार्दवता जपतो गुलाब

प्रेमाची महती पटवितो गुलाब
दुस-साठी जगणे शिकवितो गुलाब
स्वतः जीवनभर काट्याव खेळून
हसरे सौंदर्य उधळतो गुलाब

शांत प्रफुलीत करतो गुलाब
सहहृदयी संदेश देतो गुलाब
अस्तित्व आपले संपले तरी
अप्रतिम गुलकंद देतो नवाब

उष्णता पोटातून घालवितो गुलाब
सुगंधाची उधळण करतो गुलाब
गुणांची आपल्या बरसात करुनी
साजरा "प्रेमाचा दिवस" करतो गुलाब

गुलाब घ्या......गुलाब द्या.....
प्रेमाचा संदेश सर्वांना द्या
बरोबर त्याचे गुणही घ्या

**सुधाकर बर्गे...**



मराठी रसिकांना नेहमी उत्तमोत्तम आणि नवनवीन काव्य पुरविण्याचा ई-साहित्य प्रतिष्ठानचा ध्यास "नेटाक्षरी" जोमाने पार पाडत आहे. दर आठवड्यात मिळणा-या तुमच्या प्रतिसादांनी आमचा उत्साह उधाण होतोय. आमच्या रसिक वाचकांच्या ह्याच उत्स्फुर्त प्रतिसादामुळे नेटाक्षरी लवकरच शतक गाठेल. नेटाक्षरी हा साप्ताहिक अंक सध्या सुमारे ८०००० हून अधिक मराठी रसिकांना विनामूल्य वितरीत केला जातो. त्या व्यतिरिक्त वेबसाईट्वर व्हिजिट करुन वाचणा-यांची संख्या लक्षणीय आहे. हा अंक आपण आपल्या ईष्ट मित्रांना फॉरवर्ड करून त्यांनाही या आनंद यात्रेत सहभागी करून घ्यावे ही विनंती. असे करताना netaksharee@gmail.com या आमच्या आयडीचा अंतर्भाव कराल ? मग नंतरचे अंक आम्ही त्यांना पाठवत राहू. मराठी कवितेची लोकप्रियता वाढवण्यास आपला हातभार लागावा ही इच्छा. आपल्या सारख्या रसिकांच्या सहाय्याने हा अंक लवकरच एक लक्ष वाचकांपर्यंत नियमित पोहचवण्याचा आमचा संकल्प सिध्दीस जाईल असा आम्हाला विश्वास आहे.

ई -साहित्य प्रतिष्ठानची इतर विनामूल्य ई-साप्ताहिके

विनोदी मासिक : ई-स्टाप,

ऑडियो ई नियतकालीक अल्बमः स्वरनेटाक्षरी

मुलां साठी : बालनेटाक्षरी

प्रसिद्ध झालेली ई-पुस्तके

टल्लीची शाळा

ग्रेव्हयार्ड लिटरेचर

तॊ आणि ती

देशी दारुचे दुकान-३ D

तॊ, मी आणि सिगरेट

लोकल गोष्टी

ऒथंब

सईची वही

मकरंदच्या त्रिवेण्या

चार क्षण

प्रियेचे अभंग

ई-शाळा

मोरया

मीरा अनुवाद

सावळ्या मुलीची गाणी

अहं ब्रह्मास्मी

वरील ई-बुक्स विनामूल्य मिळण्यासाठी तसेच

सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

esahity@gmail.com

नेटाक्षरीचा हा विनामूल्य अंक नियमित मिळण्यासाठी व

सूचना,अभिप्राय,प्रतिक्रियांसाठी संपर्क करा

netaksharee@gmail.com

आता ई-साहित्यची आजवरची सर्व ई-प्रकाशने उपलब्ध

आहेत सी डी मध्ये फक्त ५०/- रुपयांत १११ ई-पुस्तके

www.esahity.com